# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१७/प्र.क्र.०६/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २२ फेब्रुवारी, २०१७

**वाचा :-** १) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.३०/का-५,दि.१० मे २०१६
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय, क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ३०/१०/२०१५ सोबतच्या नियमावलीतील प्रकरण क्र.२.९.२ नुसार संदर्भाधिन दिनांक १० मे २०१६ च्या शासन निर्णयान्वये महिला व बाल विकास विभागासाठी राज्यस्तरीय खरेदी समिती गठित करण्यात आली होती. उद्योग उर्जा व कामगार विभागाने दिनांक १ डिसेंबर २०१६ च्या शासन निर्णयान्वये सुधारित खरेदी धोरण घोषित केलेले आहे. त्यानुसार दिनांक १० मे २०१६ च्या शासन निर्णयानुसार गठीत केलेली राज्यस्तरीय खरेदी समिती रद्द करुन सुधारित धोरणानुसार महिला व बाल विकास विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व कार्यालयांकडून खरेदीसाठी प्रस्तावित करण्यात आलेल्या बाबींना मान्यता देण्यासाठी नवीन राज्यस्तरीय खरेदी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागाच्या संदर्भाधिन दिनांक १० मे २०१६ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेली राज्यस्तरीय खरेदी समिती या शासन निर्णयाव्दारे रद्द करण्यात येत आहे. शासन निर्णय उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक १/१२/२०१६ सोबतच्या नियमावलीतील प्रकरण क्र.२.९.२ नुसार खालीलप्रमाणे राज्यस्तरीय खरेदी समिती गठित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय खरेदी समिती**

| अ.क्र. | समितीवरील अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | सचिव,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय | अध्यक्ष |
| २ | उप सचिव, महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय ( विषयाशी संबधित) | सदस्य |
| ३ | लेखा व कोषागार संचालनालयातील गट-अ किंवा गट-ब दर्जाचा लेखाधिकारी | निमंत्रित |
| ४ | उद्योग सहसंचालक ( भांख)/ उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी | निमंत्रित |
| ५ | अन्य विभागाकडून कोणताही निमंत्रित,आवश्यकता असल्यास | निमंत्रित |
| ६ | तांत्रिक तज्ज्ञ, आवश्यकता असल्यास | निमंत्रित |
| ७ | अ) उपायुक्त (अंगणवाडी)/(आरोग्य व पोषण ) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना कार्यालयातील (पोषण आहार खरेदीसाठी / पोषण आहाराव्यतिरिक्त इतर खरेदीसाठी)<br>ब) उपआयुक्त (महिला व बाल विकास) पुणे (आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांच्या कार्यालयातील खरेदीसाठी) | सदस्य सचिव |

२. याशिवाय एखाद्या यंत्र सामुग्रीची / उपकरणाची खरेदी करण्याचे ठरल्यानंतर विभागाची गरज लक्षात घेऊन त्यानुषंगाने निपक्षपातीपणे तांत्रिक विनिर्देश (Technical Specification) ठरविण्यासाठी संबंधित खरेदीदार विभागास तांत्रिक समिती गठित करावयाचे असल्यास त्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी तसेच आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे यांनी तांत्रिक समितीची रचना व कार्यपध्दती निश्चित करुन तसा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर करावा.

३. निविदा सूचना तयार करणे, तपशिलवार वैशिष्टयांना अंतिम स्वरुप देणे, तांत्रिक निविदा उघडणे व छाननी करणे इत्यादी प्रक्रिया संबधित खरेदीदार कार्यालयांनी आपल्यास्तरावर पार पाडण्याची कार्यवाही करावी. राज्यस्तरीय खरेदी समिती खरेदी प्रक्रियेच्या अंतिम टप्पासाठी कार्यरत राहील. खरेदीप्रकिया राबविताना येणाऱ्या अडचणीबाबत विकास आयुक्त (उद्योग) यांचे मार्गदर्शन घेण्यात यावे.

४. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांनी तसेच आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या कार्यालयाकडून तसेच त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयाकडून खरेदी करण्यात येणाऱ्या साहित्यासाठी स्थानिक खरेदी समित्या उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय भांखस- २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर २०१६ नुसार गठीत कराव्यात. व त्यांना प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान करण्याचे वित्तीय अधिकार प्रदान करावेत. प्रत्यक्ष साहित्य खरेदी करण्यापुर्वी वित्तीय अधिकार नियम पुस्तीका शासन निर्णय दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील तरतूदीनुसार प्रदान केलेल्या अधिकाराप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याची (प्रशासकीय विभाग/विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख) यांची मान्यता घेऊन खरेदी प्रक्रिया पुर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२२१३२८२४८३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.02.22 17:33:23 +05'30'

**(मि. प. शेणॉय)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
६) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई
८) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
९) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई

१०) सर्व विभागीय आयुक्त
११) सर्व जिल्हाधिकारी
१२) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३) सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१४) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
१५) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण / आदिवासी / नागरी)
१६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई
१७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई
१८) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -२, नागपूर
१९) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर
२०) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
२३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
२४) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२७) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२८) महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२९) निवड नस्ती (कार्यासन ६)